**नागपूर  कार्गोहब प्रकल्पासाठी अतिरिक्त जमीन संपादित करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एव्हीएन १००५/प्र.क्र. १६६/०५/२८-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :  ४ जुलै, २००९

संदर्भ : (१) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २६ जून, २००६

(२) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांचे पत्र क्र. एमएडीसी/व्हीसीएमडी/३६७०, दि.२९ जाने. २००८ चे पत्र आणि क्र.एमएडीसी/मिहा/प्रशासन/ १५०, दि. ३ मे,२००८ चे पत्र

(३) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे क्र. कार्या-४(१) / भूसं-नाग /कावि-३५/ २००९, दि. १३ जानेवारी,२००९ चे पत्र

**प्रस्तावना :**

शासनाने संदर्भाधीन दि. २६ जून,२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मिहान प्रकल्प, नागपूर साठी ८८५.८० हे. खाजगी जमीन आणि १८२.४१ हे. शासकीय जमीन अशी एकूण १०६८.२१ हे जमीन संपादित करण्यास प्रशासकीय मंजूरी दिली आहे. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांनी दि. २९ जाने. २००८ च्या पत्रानुसार मिहान प्रकल्पाकरिता तेल्हारा येथील १.२४ हे. व दहेगाव येथील ०.९२ हे. अशा २.१६ हे. गावठाणाच्या जमीनीच्या संपादनास शासनाने प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे. त्याद्दष्टीने सदर जमीन संपादनाकरिता प्रशासकीय मान्यता देण्याच्या द्दष्टीने जमीनीच्या अधिकार अभिलेखानुसार प्रस्ताव तपासला असता, असे निदर्शनास आले आहे कि,सदर २.१६ हे. जमिनीचा उपरोक्त १८२.४१ हे. शासकीय जमिनीमध्ये समावेश आहे. तथापि, अभिलेखानुसार  सदरहू २.१६ हे. जमीन शासकीय नसून, त्यावर खाजगी मालमत्ताधारकांचे हक्क आढळून आले आहेत. त्यामुळे या जमीनीचे भूसंपादन व प्रकल्पबाधितांचे पुनर्वसन नियमानुसार करणे आवश्यक आहे. सदर भुसंपादनावरील संपूर्ण खर्च महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित स्वत:च्या निधीतून करणार आहे.

१.१ उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता, नागपूर येथील मिहान प्रकल्पासाठी मौ. तेल्हारा व मौ. दहेगांव येथील २.१६ हे.  गावठाण क्षेत्रातील खाजगी मालकीची जमीन / घरे संपादित करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

२. नागपूर येथील आंतरराष्ट्रीय प्रवासी व मालवाहतूक विमानतळ (मिहान प्रकल्प) विकसित करण्यासाठी अंदाजे

१०६८.२१ हे. जमीन संपादन करण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णय दि. २६ जून,२००६ अन्वये देण्यात आलेले प्रशासकीय मंजूरी आदेश सुधारित करण्यात येत असून, त्यानुसार. मिहान प्रकल्पासाठी ८८५.८० हे. खाजगी जमीनीऐवजी ८८७.९६ हे. खाजगी जमीन आणि १८२.४१ हे. शासकीय जमीनीऐवजी १८०.२५ हे. शासकीय जमीन अशी एकूण १०६८.२१ हे. जमीन संपादित करण्यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार अतिरिक्त संपादित करावयाच्या २.१६ हे. खाजगी जमीनीचा तपशील खालीलप्रमाणे आहे : -

| अ.क्र. | गावाचे नाव / सर्व्हे क्रमांक | अधिग्रहीत करावयाची जमीन (हेक्टर आर) |
|---|---|---|
| १ | तेल्हारा सर्व्हे क्र. १५७ | १.२४ |
| २ | दहेगांव सर्व्हे क्र. १३२<br>सर्व्हे क्र. १३३ | ०.२०<br>०.७२ |
| | एकूण | २.१६ |

३. सदर अतिरिक्त भूसंपादनावरील खर्च महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित स्वत:च्या निधीतून करेल.

४. उपरोक्त २.१६ हे. खाजगी जमीन संपादित करण्यासाठी जिल्हाधिकारी, नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in वर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०७०९१७५९५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सही/-

**( अं. वि. अंभीरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१ मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२ मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३ मा. मुख्य सचिव यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

४ अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

५ प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६ प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

७ प्रधान सचिव (१)/ सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

८ सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

९ उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित, ८ वा मजला, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई

१० विभागीय आयुक्त, नागपूर

११ आयुक्त, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर

१२ आयुक्त, महानगरपालिका, नागपूर

१३ जिल्हाधिकारी, नागपूर

१४ महालेखापाल - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर

१५ निवड नस्ती